**राज्यातील अनुसूचित क्षेत्रातील ग्रामपंचायतीना ५ % थेट निधी योजना.**

**ग्राम स्तरीय, यशदा स्तरीय प्रशिक्षण खर्च व प्रशिक्षण साहित्य छपाई खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : पेसा २०१५/ प्रक्र.८० / का-१७**

मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२

दिनांक : १ ऑगस्ट, २०१५

**वाचा :**

१. शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. पेसा २०१५/ प्र.क्र.१९/ का-१७, दिनांक २१ एप्रिल, २०१५

२. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. संकीर्ण २०१४/ प्रक्र.६७/ योजना-४ दिनांक २० मे, २०१४.

३. संचालक, संशोधन व प्रलेखन केंद्र, यशवंतराव चव्हाण विकास प्रबोधिनी, पुणे यांचे पत्र क्र.राग्राविसं/पेसा कक्ष/प्र.निधी/१५-१६, दि. ९ जुलै, २०१५ चे पत्र.

४. संचालक, संशोधन व प्रलेखन केंद्र, यशवंतराव चव्हाण विकास प्रबोधिनी, पुणे यांचे पत्र क्र.राग्राविसं/पेसा कक्ष/प्र.निधी/१५-१६, दि. २८ जुलै, २०१५ चे पत्र.

**प्रस्तावना :-** .

आदिवासी उपयोजनेंतर्गत प्राप्त होणा-या एकूण नियतव्ययाच्या ५ % निधी अनुसूचित क्षेत्रातील ग्रामपंचायती व त्याअंतर्गत गावे/वस्त्या/वाडया/पाडे यांना त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात वितरीत करण्यास शासन निर्णय, दि.२१/४/२०१५ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. सन २०१५-१६ या आर्थिक वर्षामध्ये आदिवासी उपयोजनेकरिता रु. ५१७० कोटी इतका नियतव्यय उपलब्ध झालेला आहे. त्यापैकी ५ % प्रमाणे रु.२५८.५० कोटी इतका निधी पुरवणी मागणीव्दारे उपलब्ध होणार आहे. सदरचा निधी अनुसूचित क्षेत्रातील १३ जिल्हयातील ५९ पंचायत समितीमधील २८३५ ग्रामपंचायतींना (ग्रामसभा कोष) त्यांच्या अंतर्गत येणा-या गावे/वस्त्या/वाडया/पाडे यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात शासन स्तरावरुन RTGS व्दारे थेट उपलब्ध करुन देण्यात येणार आहे. सदर निधीमधून अनुसूचित क्षेत्रातील ग्रामपंचायतीना सक्षम व आर्थिकदृष्टया सबळ करण्यासाठी (अ) पायाभूत सुविधा, (ब) वनहक्क अधिनियम व पेसा कायद्याची अंमलबजावणी (क) आरोग्य, स्वच्छता व शिक्षण (ड) वनीकरण, वन्यजीव संवर्धन ,जलसंधारण, वनतळी, वन्यजीव पर्यटन व वन उपजिविका क्षेत्रांतर्गत समाविष्ट होणारी कामे घेण्यात येणार आहेत. या योजनेची प्रभावी अंमलबजावणी होण्यासाठी ग्रामस्तरावरील सरपंच / उपसरपंच, ग्रामसभा कोष ३ सदस्य (ग्रामसेवक धरुन ), वनहक्क कायद्याखाली तयार झालेल्या समित्यांचे एक प्रतिनिधी अशा एकूण पाच व्यक्तींचे तीन दिवशीय अनिवासी क्षमता वृध्दी प्रशिक्षण जिल्हा परिषद प्रभागनिहाय समूह स्तरावर ( सरासरी १०

ग्रामपचांयतीचा १ समूह गट ) घेण्याचे प्रस्तावित आहे. सदर प्रशिक्षण ऑक्टोंबर २०१५ अखेर पूर्ण करणे अपेक्षित आहे. याबाबतच्या सविस्तर सूचना ग्राम विकास विभागामार्फत स्वंतत्रपणे निर्गमित करण्यात येत आहेत. सदर ग्रामस्तरावरील प्रशिक्षणार्थींना प्रशिक्षण देण्यासाठी यशदा स्तरावर १२० प्रवीण प्रशिक्षकांना ५ दिवशीय प्रशिक्षण ऑगस्ट, २०१५ अखेर पर्यंत देणे प्रस्तावित आहे. त्याचबरोबर पेसा अंतर्गत जिल्हा स्तरावरील व तालुका स्तरावरील अंदाजे ६०० प्रशासकीय अधिकारी ( प्रकल्प अधिकारी /सहा. प्रकल्प अधिकारी (ए.आ.वि.प्र.), उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रा.पं.) गट विकास अधिकारी (पं.स.) तहसिलदार, वन परिक्षेत्र अधिकारी, तालुका कृषी अधिकारी, विस्तार अधिकारी (ग्रा.पं.), पंचायत समिती अभियंता, आदिवासी विकास निरीक्षक ) यांना यशदा स्तरावर २ दिवशीय प्रशिक्षण माहे ऑगस्ट व सप्टेबर, २०१५ मध्ये देणे प्रस्तावित आहे. प्रशिक्षणासाठी प्रशिक्षण मोडयुल तयार करण्यासाठी तज्ञ व्यक्तींची ३ दिवशीय कार्यशाळा यशदा स्तरावर घेण्यात येणार आहे. त्याचबरोबर प्रशिक्षण साहित्याचे संकलन यशदा स्तरावर करण्याचे प्रस्तावित आहे. प्रशिक्षण साहित्याचे संकलन यशदा स्तरावर केल्यानंतर त्याची छपाई ही आदिवासी विकास विभागामार्फत करण्यात येणार आहे. सदर प्रशिक्षण साहित्य संचाच्या प्रत्येक ग्रामपचांयतीसाठी एक संच असे एकूण २८३५ प्रशिक्षण संच व एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प कार्यालय, पेसा क्षेत्रातील जिल्हा परिषदा व पचांयत समितीची कार्यालये इ. ना लागणारे प्रशिक्षण संच गृहीत धरुन एकूण ३५०० प्रशिक्षण साहित्य संचाची छपाई करणे आवश्यक आहे. वरील बाबी विचारात घेऊन संचालक, संशोधन व प्रलेखन केंद्र , यशदा,पुणे यांनी त्यांच्या संदर्भ क्र. ३ व ४ वरील अनुक्रमे दि. ९ जुलै, २०१५ व २८ जुलै, २०१५ च्या पत्रांन्वये ग्राम स्तरावरील प्रशिक्षण, यशदा स्तरावरील प्रशिक्षण व राज्यस्तरावरुन प्रशिक्षण साहित्य संचाची छपाई याबाबतचे खर्चाचे अंदाजपत्रक सादर केले आहे. त्यामध्ये यशदा स्तरीय प्रशिक्षणासाठी रु. ४५,३२,०००/-, ग्रामस्तरीय प्रशिक्षण खर्चासाठी रु. १,८७,११,०००/- व राज्य स्तरावरुन प्रशिक्षण साहित्य संच छपाईसाठी अंदाजित रु.२१,०००००/- असा एकूण रु. २,५३,४३,०००/- इतका खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

प्रस्तावनेत नमूद केलेल्या बाबी विचारात घेऊन ग्रामस्तरीय प्रशिक्षणाकरीता रु. १,८७,११,०००/- (परिशिष्ट -अ), यशदा पुणे स्तरीय प्रशिक्षण उपक्रमाकरीता रु. ४५,३२,०००/- (परिशिष्ट -ब ) व राज्य स्तरावरुन प्रशिक्षण कार्यकमातर्गत प्रशिक्षण साहित्य संच छपाईसाठी अंदाजित रु.२१,०००००/- असा एकूण रु.२,५३,४३,०००/- ( अक्षरी रु. दोन कोटी त्रेपन्न लक्ष त्रेचाळीस हजार फक्त ) इतक्या खर्चाच्या अंदाजत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. या बाबीवर होणारा खर्च, मागणी क्रमांक टी-५, २२२५ अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागास वर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण, केंद्रीय सहाय्य योजना ( ०१ )( ४३ ) भारताच्या संविधानाच्या अनुच्छेद २७५ ( १ ) अन्वये केंद्रीय सहाय्य (केंद्र योजना ) (२२२५ २४२४ ) ३१,सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ या वर्षात “ संस्थांचे बळकटीकरण”

( Strengthening of Institution ) या कार्यक्रमाखाली मंजूर व वितरीत केलेल्या रु. १४.६८ कोटी इतक्या तरतुदीतून करण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या क्र. विअप्र-२०१३/प्रक्र ३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्राप्त वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उप विभाग-तीन , मधील अनुक्रमांक ४,परिच्छेद क्र. २७ ( २) अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन सचिव, आदिवासी विकास विभाग यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदरची रक्कम खर्च करण्यास आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी विहित कार्यपध्दती व नियमास अनुसरुन, परिशिष्ट -"अ" नुसार रु.१,८७,११,०००/- इतकी रक्कम ग्राम विकास विभागास व परिशिष्ट -"ब" नुसार रु. ४५,३२,०००/-इतकी रक्कम महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे यांना अदा करावी. याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र ग्राम विकास विभाग व महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक व आदिवासी विकास विभागाकडे सादर करावे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८०११७२८१८५५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

Prabhakar Bapurao Gawade

Digitally signed by Prabhakar Bapurao Gawade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prabhakar Bapurao Gawade
Date: 2015.08.01 17:31:08 +05'30'

**( प्रभाकर बा. गावडे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.मंत्री / राज्यमंत्री, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय यांचे खाजगी सचिव
२) मा.प्रधान सचिव (ग्रा.वि.), ग्रामविकास व जलसंधारण विभाग,बांधकाम भवन, मुंबई-०१
३) महासंचालक,यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, राजभवन आवार, बाणेर रस्ता,पुणे-०७
४) सर्व विभागीय आयुक्त
५) सचिव ( वने ) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
६) आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक
७) जिल्हाधिकारी, पालघर/ ठाणे/ नाशिक/ नंदुरबार/ धुळे/ जळगांव/ अहमदनगर/ पुणे/ नांदेड/ अमरावती/ यवतमाळ/ चंद्रपूर व गडचिरोली

८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर/ ठाणे/ नाशिक/ नंदुरबार/ धुळे/ जळगांव/ अहमदनगर/ पुणे/ नांदेड/ अमरावती/ यवतमाळ/ चंद्रपूर व गडचिरोली

९) अप्पर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/ नाशिक/अमरावती/नागपूर

१०) सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प कार्यालय

११) महालेखापाल (लेखा परिक्षा ) (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर

१२) जिल्हा कोषागार अधिकारी,नाशिक

१३) वित्त विभाग, (विनियम )व (व्यय- १४ ) मंत्रालय, मुंबई

१४) सचिव (आदिवासी विकास विभाग) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई

१५) संचालक, लेखा व कोषागारे, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालय, मुंबई

१६) सर्व उपसचिव, आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई-३२

१७) उप सचिव ( पं.रा.), ग्रामविकास व जलसंधारण विभाग,बांधकाम भवन, मुंबई-०१

१८) सर्व कार्यासने, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२

१९) कक्ष अधिकारी कार्यासन ६ व कार्यासन-१९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

२०) निवड नस्ती (का-१७)

शासन निर्णय क्र.पेसा २०१५/ प्रक्र.८० / का-१७, दि. १ ऑगस्ट, २०१५ सोबतचे

## परिशिष्ट -"अ"

| ग्रामस्तरीय प्रशिक्षणासाठी आवश्यक निधीचे अंदाजपत्रक | |
|---|---|
| ग्रामस्तरीय प्रशिक्षणाचा कालावधी | ३ दिवस |
| ग्रामस्तरीय प्रशिक्षणासाठी निधीचा दर: | रु. ४४० प्रती व्यक्ती प्रती दिन |
| प्रती ग्राम पंचायत प्रशिक्षणार्थींची संख्या | ५ |
| २८३५ ग्राम पंचायतींमधील प्रशिक्षणार्थींची एकूण संख्या | १४१७५ (२८३५ x ५) |
| **ग्रामस्तरीय प्रशिक्षणासाठी आवश्यक एकूण निधी** | **रु. १,८७,११,०००** (१४१७५ x ४४० x ३) |

## परिशिष्ट - "ब"

## यशदास्तरीय उपक्रमांकरीता खर्चाचे अंदाजपत्रक

| १) प्रशिक्षण मोड्यूल अंतिम करण्यासाठी तीन दिवसीय कार्यशाळा | | | |
|---|---|---|---|
| **खर्चाचे विवरण** | **दर** | **संख्या** | **रक्कम (रु.)** |
| प्रशिक्षण सुविधा, निवास, भोजन | रु. २००० प्रती व्यक्ती प्रती दिन | १५ व्यक्ती x ३ दिवस | ९०,००० |
| अशासकीय व्यक्तींचा प्रवासखर्च | रु. ३००० प्रती व्यक्ती | १० व्यक्ती | ३०,००० |
| **एकूण** | | | **१,२०,०००** |
| **२) प्रशिक्षण साहित्याचे संकलन** | | | |
| **खर्चाचे विवरण** | **दर** | **संख्या** | **रक्कम (रु.)** |
| प्रशिक्षण साहित्याचे संकलन व संस्करण | रु. ५० प्रति पृष्ठ | ५०० पृष्ठ | २५,००० |
| प्रशिक्षण साहित्याचे DTP व मुद्रणायोग्य Prototype तयार करणे | रु. १५० प्रती व्यक्ती | ५०० पृष्ठ | ७५,००० |
| **एकूण** | | | **१,००,०००** |
| **३) १२० प्रशिक्षकांचे पाच दिवसीय प्रशिक्षण** | | | |
| **खर्चाचे विवरण** | **दर** | **संख्या** | **रक्कम (रु.)** |
| प्रशिक्षण सुविधा, निवास, भोजन | रु. २००० प्रती व्यक्ती प्रती दिन | १२० व्यक्ती x ५ दिवस | १२,००,००० |
| अशासकीय व्यक्तींचा प्रवासखर्च | रु. २५०० प्रती व्यक्ती | १२० व्यक्ती | ३,००,००० |
| **एकूण** | | | **१५,००,०००** |
| **४) ६०० प्रशासकीय अधिकाऱ्यांचे दोन दिवसीय प्रशिक्षण** | | | |
| **खर्चाचे विवरण** | **दर** | **संख्या** | **रक्कम (रु.)** |
| प्रशिक्षण सुविधा, निवास, भोजन | रु. २००० प्रती व्यक्ती प्रती दिन | ६०० व्यक्ती x २ दिवस | २४,००,००० |
| **एकूण** | | | **२४,००,०००** |
| **५) यशदा प्रशासकीय खर्च** | **वरील १+२+३+४ खर्चाच्या १०%** | -- | ४,१२,००० |
| **एकूण खर्च (१+२+३+४+५)** | -- | -- | **४५,३२,०००** |

***************